सरकारी कामगार अधिकारी, गट-ब (वेतन मॅट्रीक्स स्तर एस-१५, रु. ४१८००-१३२३००) या पदावर तात्पुरती पदोन्नती देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पदोन्न-२०२१/प्र.क्र.५३/कामगार-८**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: १२ मे, २०२२

**वाचा :**

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांकः क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३६६/१६-ब, दि.०७.०५.२०२१
२) सामान्य प्रशासन विभाग, अधिसुचना क्रमांकः एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९/कार्यासन-१२, दि.१४.०७.२०२१
३) कामगार आयुक्त यांचे पत्र क्रमांक: आस्था/स.का.अ./पदो/१२२०/कार्यासन-२, दि.२१.०१.२०२२

**प्रस्तावना :**

कामगार आयुक्त यांच्या उपरोक्त अ.क्र.३ येथील नमूद पत्रानुसार त्यांच्या आस्थापनेवरील गट-क संवर्गातील कर्मचा-यांची सरकारी कामगार अधिकारी, गट-ब या पदावर पदोन्नतीसाठी सन २०२१-२२ या निवडसुची वर्षाकरिता विभागीय पदोन्नती समितीमार्फत पात्रता तपासून पदोन्नतीस पात्र कर्मचा-यांचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला. त्यास अनुसरुन सरकारी कामगार अधिकारी, गट-ब या संवर्गाच्या पदोन्नती कोट्यातील रिक्त पदांवर एकूण ०४ कर्मचा-यांच्या नियमित निवडसूचीस सामान्य प्रशासन विभागाने मान्यता दिलेली आहे. त्यान्वये, कामगार आयुक्त यांच्या आस्थापनेवरील गट क संवर्गातील एकूण ०४ कर्मचा-यांची सरकारी कामगार अधिकारी, गट-ब या पदावर पदोन्नती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

कामगार आयुक्त यांच्या आस्थापनेवरील गट-क संवर्गातील एकुण ०४ कर्मचा-यांना सरकारी कामगार अधिकारी, गट-ब (वेतन मॅट्रिक्स स्तर एस-१५, रु.४१८००-१३२३००) या संवर्गात या शासन

निर्णयान्वये तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत असून त्यांची खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ. क्र | ज्येष्ठता क्रमांक | अधिकाऱ्यांचे नाव, पदनाम व प्रवर्ग | पदस्थापनेचा महसूली विभाग | पदोन्नतीनंतरची पदस्थापना कार्यालय |
|---|---|---|---|---|
| १ | २९ | श्रीमती प्रे. र. मोहने, वरिष्ठ कामगार अन्वेषक, अ.जा. | कोकण-२ | सरकारी कामगार अधिकारी, मुंबई उपनगर (एच वॉर्ड), मुंबई |
| २ | ३८ | श्री. वि. मा. गायकवाड, अधिक्षक, अ.जा. | पुणे | सहायक कामगार आयुक्त कार्यालय, सोलापूर येथील रिक्त पदी |
| ३ | ४१ | श्री. सिध्देश्वर फड, वरिष्ठ कामगार अन्वेषक, भ.ज.ड | नागपूर | सहायक कामगार आयुक्त कार्यालय, भंडारा येथील रिक्त पदी |
| ४ | ५४ | श्री. न. चि. वझरे, वरिष्ठ कामगार अन्वेषक, अ.ज. | नाशिक | कामगार उप आयुक्त कार्यालय, नाशिक येथील रिक्त पदी |

२. वरील अधिका-यांना खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे.

(१) मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधिन राहून पदोन्नती कोटयातील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात सेवाजेष्ठतेनुसार भरण्याबाबत सा.प्र.वि./१६-ब यांच्या दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार सदर मान्यता देण्यात येत आहे.

(२) सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरूपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील व पदोन्नतीसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

(३) सदर निवडसूचीतील सेवाज्येष्ठतेनुसार पात्र असलेल्या, तथापि पदोन्नती नाकारलेल्या अधिकाऱ्यांच्या पदोन्नतीसंदर्भात सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१२.०९.२०१६ च्या शासन निर्णयानुसार कार्यवाही करण्यात येईल.

३.  सदर पदोन्नत अधिका-यांना त्यांच्या पदोन्नतीनंतरच्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी याद्वारे तात्काळ कार्यमुक्त करण्यात येत असून त्यांनी नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू व्हावे. याबाबतचा रुजू अहवाल संबंधित पदोन्नत अधिका-यांनी कामगार आयुक्त  यांच्यामार्फत शासनास सादर करावा. तसेच त्यांनी अनधिकृतपणे रजेवर जाऊ नये. तसेच पदस्थापना रद्द अथवा त्यात बदल करणेसाठी कोणत्याही स्वरुपाचे आवेदन सादर करु नये. तसे केल्यास सदर अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात पात्र ठरतील, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

४.  महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली,२०२१ मधील २ (ड) आणि उपरोक्त अ.क्र.२ येथील नमूद अधिसुचनेतील नियम १३ मधील तरतुदीनुसार पदोन्नतीने नियुक्ती होणा-या सदर अधिका-यांनी सदर आदेश निघाल्याच्या तारखेपासून ३० दिवसांच्या विहित मुदतीमध्ये रुजु होणे आवश्यक आहे. सदर मुदतीत रुजु न झाल्यास संबंधित अधिका-याचा अनुपस्थितीचा कालावधी अकार्यदिन ( dias non) म्हणुन गणला जाईल, याची देखील संबंधितांनी नोंद घ्यावी.

५.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०५१२१८०२२२३२१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DR. SHRIKANT LAXAMANRAO PULKUNDWAR

Digitally signed by DR. SHRIKANT LAXAMANRAO PULKUNDWAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=INDUSTRIES, ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=feb24b5f5d1512bb47f7bae5ad1db4953358cd43c999bdf0814c6bb78364d50a, cn=DR. SHRIKANT LAXAMANRAO PULKUNDWAR
Date: 2022.05.12 18:04:16 +05'30'

**(डॉ. श्री.ल.पुलकुंडवार)**

**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई

४. कामगार आयुक्त, कामगार भवन, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१
५. महालेखापाल कार्यालय (ले. व अ.)/(ले.प.), मुंबई-१/नागपूर-२
६. अपर कामगार आयुक्त, कोकण/नागपूर/पुणे
७. कामगार उप आयुक्त (प्रशासन), कामगार भवन, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई
८. कामगार उप आयुक्त,मुंबई उपनगर/पुणे/नाशिक
९. सहायक कामगार आयुक्त, मुंबई उपनगर/सोलापूर/भंडारा/नाशिक
१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११.सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
१२.संबंधित पदोन्नत अधिकारी (कामगार आयुक्त यांचेमार्फत)
१३.निवड नस्ती